**नगरपालिका / नगरपरिषदा व नगरपंचायत क्षेत्रातील थकित मालमत्ता करावरील शास्ती माफ करुन कर वसूल करण्यासाठी प्रोत्साहनात्मक अभय योजना राबविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः- एमयुएम-२०२५/प्र.क्र.७०/नवि-१७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
४ था मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १९ मे, २०२५

**संदर्भः-** १) उपसचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय यांचे पत्र प्र.क्र.१/नवि-४, दि.२०.०१.२०२५.
२) शासन पत्र एमयुएम-२०२५/प्र.क्र.३४/नवि-१७ दि.२९.०१.२०२५ रोजीचे पत्र.
३) मा.मंत्रिमंडळ बैठक दि.१५.०४.२०२५ रोजीचे इतिवृत्त.
४) शासन अध्यादेश क्र.२, दि.३०.०४.२०२५.

**प्रस्तावनाः-**

राज्यात नगरपालिका/ नगरपरिषदा व नगरपंचायत क्षेत्रामध्ये अनेकवेळा मालमत्ता कराची थकबाकीची रक्कम जास्त असणे, मालमत्ता धारकांची आर्थिक अडचण असणे या व इतर कारणांमुळे मालमत्ता कराचा भरणा करण्यात येत नाही. महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ चे कलम १५० (अ) (१) नुसार बिलाच्या न भरलेल्या रकमेवर संबंधित नगरपरिषद/नगरपंचायत यांचेकडून दरमहा २% शास्ती लावण्याचे प्रावधान आहे. यामुळे मालमत्ता धारकाच्या एकूण थकबाकीमध्ये वाढ होऊन याचा विपरित परिणाम कर वसुलीवर होतो. यावर उपाययोजना म्हणून नगरपरिषदा क्षेत्रातील थकीत मालमत्ता करावरील शास्ती माफ करून कर वसूल करण्यासाठी प्रोत्साहन मिळण्याच्या दृष्टीने अभय योजना लागू करण्याबाबत शासन स्तरावर विचार करण्यात आला.

२. या विषयाबाबत दि.१५ एप्रिल, २०२५ रोजी आयोजित मा.मंत्रिमंडळाच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार नगरपरिषद, नगरपंचायत क्षेत्रातील मालमत्ता करावरील शास्ती माफ करण्याच्या अनुषंगाने महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ मध्ये सुधारणा करण्याबाबतचा अध्यादेश दि.३० एप्रिल, २०२५ रोजी प्रख्यापित करण्यात आला आहे. याद्वारे महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ चे कलम- १५० अ (१) मध्ये शास्ती माफीसंदर्भात तरतूदीचा समावेश करण्यात आला. या तरतूदीच्या अनुषंगाने नगरपरिषद, नगरपंचायत क्षेत्रातील मालमत्ता करावरील शास्ती माफ करण्यासाठी अभय योजना लागू करण्याचे प्रावधान करण्यात आले आहे. सदर अभय योजना राबविण्याबाबत कार्यपद्धती आणि अटी व शर्ती निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्यातील नगरपरिषदा, नगरपंचायतींच्या क्षेत्रातील मालमत्ता करावरील शास्ती माफ करण्याच्या दृष्टीने महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम १९६५ चे कलम- १५० अ (१) मध्ये करण्यात आलेल्या सुधारणेच्या अनुषंगाने नगरपरिषद, नगरपंचायत क्षेत्रातील मालमत्ता करावरील शास्ती अंशतः / पुर्णतः माफ करुन कर वसुलीला प्रोत्साहन मिळण्याच्या दृष्टीने अभय योजना राबविण्याबाबत पुढीलप्रमाणे कार्यपद्धती आणि अटी व शर्ती निश्चित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे:-

(१) शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापर्यंत नगरपरिषदा, नगरपंचायती थकीत असलेल्या सर्व शास्तीच्या माफीसाठी जिल्हाधिकारी यांचेकडे प्रस्ताव सादर करू शकतील.

(२) जिल्हाधिकारी यांनी एकूण शास्तीच्या ५० टक्के पर्यंतच्या शास्ती माफी बाबत प्रस्ताव प्राप्त झाल्यापासून ३० दिवसांत निर्णय घेणे बंधनकारक असेल. याबाबत जिल्हाधिकारी यांचा निर्णय अंतिम असेल.

(३) एकत्रित मालमत्ता करावरील शास्ती ५० टक्क्यांपेक्षा अधिक माफ करावयाची झाल्यास जिल्हाधिकारी यांनी प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर अभिप्रायासह प्रमाणित करून आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांचेकडे सादर करावेत. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांनी जिल्हाधिकाऱ्यांकडून प्राप्त झालेले प्रस्ताव शिफारशीसह शासनास सादर करावेत. अशा प्रस्तावावर शासनाने घेतलेला निर्णय अंतिम असेल.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२५०५१९१५१४२४४६२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**सोबत** : शासन अध्यादेश क्र.२, दि.३०.०४.२०२५.

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: CN = VIDYA RAMAPPA HAMPAYYA, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2025.05.19 15:16:05 +05'30'

**(विद्या हम्पय्या)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) महोदय यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. उप मुख्यमंत्री (नगर विकास) महोदय यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई.

६. प्रधान सचिव (नवि-२) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, बेलापूर, नवी मुंबई
८. सर्व जिल्हाधिकारी.
९. मुख्याधिकारी (सर्व नगरपरिषद, नगरपंचायत).
१०. निवडनस्ती.

RNI No. MAHBIL /2009/35530

सत्यमेव जयते

# महाराष्ट्र शासन राजपत्र

## असाधारण भाग चार

वर्ष ११, अंक ९] बुधवार, एप्रिल ३०, २०२५/वैशाख १०, शके १९४७ [पृष्ठे ३, किंमत : रुपये २३.००

**असाधारण क्रमांक ३०**

**प्राधिकृत प्रकाशन**

**महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी प्रख्यापित केलेले अध्यादेश व केलेले विनियम.**

**अनुक्रमणिका**



**नगरविकास विभाग**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय,
मुंबई ४०० ०३२, दिनांक ३० एप्रिल २०२५.

**MAHARASHTRA ORDINANCE No. II OF 2025.**

AN ORDINANCE

FURTHER TO AMEND THE MAHARASHTRA MUNICIPAL COUNCILS, *NAGAR PANCHAYATS* AND INDUSTRIAL TOWNSHIPS ACT, 1965.

**सन २०२५ चा महाराष्ट्र अध्यादेश क्रमांक २.**

**महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ यात आणखी सुधारणा करण्यासाठी अध्यादेश.**

**ज्याअर्थी,** राज्य विधानमंडळाच्या दोन्ही सभागृहांचे अधिवेशन चालू नाही ;

**आणि ज्याअर्थी,** यात यापुढे दिलेल्या प्रयोजनांकरिता, महाराष्ट्राच्या राज्यपालांनी, महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ यात आणखी सुधारणा करण्यासाठी तात्काळ कार्यवाही करणे जीमुळे आवश्यक व्हावे, अशी परिस्थिती अस्तित्वात असल्याबद्दल त्यांची खात्री पटली आहे ; १९६५ चा महा. ४०.

**त्याअर्थी, आता,** भारताच्या संविधानाच्या अनुच्छेद २१३ च्या खंड (१) द्वारे प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करून, महाराष्ट्राचे राज्यपाल, याद्वारे, पुढील अध्यादेश प्रख्यापित करीत आहेत :—

संक्षिप्त नाव व प्रारंभ.

**१.** (१) या अध्यादेशास, महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी (दुसरी सुधारणा) अध्यादेश, २०२५, असे म्हणावे.

(२) तो, तात्काळ अंमलात येईल.

सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम १५०क ची सुधारणा.

**२.** महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ याच्या कलम १५०क मध्ये, पोट-कलम (१) मधील,— १९६५ चा महा. ४०.

(१) विद्यमान परंतुकापूर्वी, पुढील परंतुक समाविष्ट करण्यात येईल :—

" परंतु, नगरपरिषद, राज्य शासनाच्या मान्यतेने, मालमत्ता कर भरण्यासाठी प्रामुख्याने जबाबदार असलेल्या कोणत्याही व्यक्तीला किंवा व्यक्तींच्या वर्गाला शास्तीमध्ये सूट देईल :";

(२) विद्यमान परंतुकामध्ये, " परंतु," या मजकुराऐवजी, " परंतु आणखी असे की," हा मजकूर दाखल करण्यात येईल.

## निवेदन

महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ (१९६५ चा महा. ४०) च्या तरतुदींनुसार, नगरपरिषदा, नगर पंचायती त्यांच्या क्षेत्रांच्या अंतर्गत स्थित असलेल्या जमिनी आणि इमारती किंवा दोन्ही यांवर मालमत्ता कर बसवितात.

२. नगरपरिषदा आणि नगर पंचायती यांच्याद्वारे बसविण्यात येणारा मालमत्ता कर हा, मालमत्ता धारक अशा मालमत्ता वापरात नसण्याच्या कारणामुळे, मालमत्ता धारकांच्या आर्थिक अडचणीमुळे आणि अनेक कारणांमुळे भरत नाहीत असे निदर्शनास आले आहे. उक्त अधिनियमाच्या कलम १५०क मध्ये, जर करांची रक्कम भरण्यास जबाबदार असलेल्या व्यक्तीने विनिर्दिष्ट वेळेच्या आत ती भरली नाही तर, जी अदत्त करांची रक्कम किंवा तिचा भाग यांव्यतिरिक्त, त्याने ज्या दिनांकापर्यंत असा कर भरावयाचा होता, त्या शेवटच्या दिनांकानंतर प्रत्येक महिन्यासाठी किंवा त्याच्या भागासाठी अशा कराच्या दोन टक्के इतकी रक्कम, शास्ती म्हणून भरण्यास तो जबाबदार असेल अशी तरतूद करण्यात आली आहे. कालौघात, विनिर्दिष्ट वेळेत करांची भरणा न केल्यामुळे, उक्त शास्तीची रक्कम, मालमत्ता करांच्या रकमेपेक्षा जास्त होते आणि ती वाढतच राहते. म्हणून, शास्ती भरण्याची रक्कम, मालमत्ता करांच्या रकमेपेक्षा जास्त असल्याने किंवा दंडाची रक्कम सतत वाढत असल्यामुळे, अनेक मालमत्ताधारक करांची उक्त थकबाकी भरत नाहीत. याचा नगरपरिषदा व नगर पंचायती यांच्या कर संकलनावर प्रतिकूल परिणाम होतो.

३. पाणीपुरवठा, स्वच्छता, पदपथ दिवे, रस्ते, इत्यादींसारख्या सुख-सुविधा पुरवण्याकरिता करांची वेळेवर वसुली करणे आवश्यक आहे. मालमत्ता करांची थकबाकी प्रदान करण्याकरिता मालमत्तेच्या मालकांना प्रोत्साहन देण्यासाठी शास्तीमध्ये सूट देण्याचा विषय विचाराधीन होता.

तथापि, सध्या उक्त अधिनियमामध्ये मालमत्ता करांवरील शास्तीच्या रकमेत सूट देण्याबाबत कोणतीही तरतूद नाही. त्यामुळे परिषदेला, राज्य शासनाच्या मान्यतेने, मालमत्ता कर भरण्यासाठी प्रामुख्याने जबाबदार असलेल्या कोणत्याही व्यक्तीला किंवा व्यक्तींच्या वर्गाला शास्तीच्या रकमेत सूट देण्याची तरतूद करण्यासाठी उक्त अधिनियमाच्या कलम १५०क मध्ये सुधारणा करणे, शासनास इष्ट वाटते.

४. राज्य विधानमंडळाच्या दोन्ही सभागृहांचे अधिवेशन चालू नाही आणि उपरोक्त प्रयोजनांसाठी, महाराष्ट्राच्या राज्यपालांनी, महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५, यात आणखी सुधारणा करण्यासाठी तात्काळ कार्यवाही करणे जीमुळे आवश्यक व्हावे अशी परिस्थिती अस्तित्वात असल्याबद्दल त्यांची खात्री पटली आहे. म्हणून हा अध्यादेश प्रख्यापित करण्यात येत आहे.

मुंबई,
दिनांक ३० एप्रिल २०२५.

**सी. पी. राधाकृष्णन,**
महाराष्ट्राचे राज्यपाल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**डॉ. के. एच. गोविंद राज,**
शासनाचे प्रधान सचिव.

ON BEHALF OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, PRINTED AND PUBLISHED BY DIRECTOR, RUPENDRA DINESH MORE, PRINTED AT GOVERNMENT CENTRAL PRESS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004 AND PUBLISHED AT DIRECTORATE OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATIONS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004. EDITOR : DIRECTOR, RUPENDRA DINESH MORE.

RNI No. MAHENG /2009/35528

सत्यमेव जयते

# महाराष्ट्र शासन राजपत्र

## असाधारण भाग आठ

वर्ष ११, अंक १६] बुधवार, एप्रिल ३०, २०२५/वैशाख १०, शके १९४७ पृष्ठे ३, किंमत : रुपये २७.००]

**असाधारण क्रमांक ४२**

**प्राधिकृत प्रकाशन**

**महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी प्रख्यापित केलेले अध्यादेश व केलेले विनियम आणि विधि व न्याय विभागाकडून आलेली विधेयके (इंग्रजी अनुवाद).**

In pursuance of clause (*3*) of article 348 of the Constitution of India, the following translation in English of the Maharashtra Municipal Councils, *Nagar Panchayats* and Industrial Townships (Second Amendment) Ordinance, 2025 (Mah. Ord. II of 2025), is hereby published under the authority of the Governor.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

SATISH WAGHOLE,
Secretary (Legislation) to Government,
Law and Judiciary Department.

[ Translation in English of the Maharashtra Municipal Councils, *Nagar Panchayats* and Industrial Townships (Second Amendment) Ordinance, 2025 (Mah. Ord. II of 2025), published under the authority of the Governor].

**URBAN DEVELOPMENT DEPARTMENT**

Mantralaya, Madam Cama Marg, Hutatma Rajguru Chowk,
Mumbai 400 032, dated the 30th April 2025.

**MAHARASHTRA ORDINANCE No. II OF 2025.**

*AN ORDINANCE*

*further to amend the Maharashtra Municipal Councils, Nagar Panchayats and Industrial Townships Act, 1965.*

WHEREAS both Houses of the State Legislature are not in session;

AND WHEREAS the Governor of Maharashtra is satisfied that circumstances exist which render it necessary for him to take immediate action further to amend the Maharashtra Municipal Councils, *Nagar Panchayats* and Industrial Townships Act, 1965, for the purposes hereinafter appearing; Mah. XL of 1965.

NOW, THEREFORE, in exercise of the powers conferred by clause (*1*) of article 213 of the Constitution of India, the Governor of Maharashtra is hereby pleased to promulgate the following Ordinance, namely :—

Short title and commencement.

**1.** (*1*) This Ordinance may be called the Maharashtra Municipal Councils, *Nagar Panchayats* and Industrial Townships (Second Amendment) Ordinance, 2025.

(*2*) It shall come into force at once.

Amendment of section 150A of Mah. XL of 1965.

**2.** In section 150A of the Maharashtra Municipal Councils, *Nagar Panchayats* and Industrial Townships Act, 1965, in sub-section (*1*),— Mah. XL of 1965.

(*1*) before the existing proviso, the following proviso shall be inserted, namely :—

"Provided that, the Council may, with the approval of the State Government, grant rebate in penalty to any person or class of persons primarily liable for payment of property taxes :";

(*2*) in the existing proviso, for the words "Provided that," the words "Provided further that," shall be substituted.

## STATEMENT

The property taxes are levied by the Municipal Councils and *Nagar Panchayats* on lands and buildings or both situated within their areas as per the provisions of the Maharashtra Municipal Councils, *Nagar Panchayats* and Industrial Townships Act, 1965 (Mah. XL of 1965).

2. It is noticed that the property taxes levied by the Municipal Councils and *Nagar Panchayats* are not paid by the property owners due to the fact that, properties are not is use, financial difficulties of the property owners or other reasons. Section 150A of the said Act provides that, if a person liable to pay property taxes does not pay the same within specified time limit, then he shall be liable to pay by way of penalty in addition to the amount of such taxes or part thereof which has remained unpaid, a sum equal to two per cent. of such tax for each month or part thereof after the last date. Over the period of time due to non-payment of taxes within specified time, the amount of the said penalty becomes more than the amount of the property taxes and the same continues to increase. Since the amount of the penalty is more than the amount of the property taxes or the amount of the penalty continues to increase, many property owners do not pay the said arrears of taxes. This adversely affects the tax collection of the Municipal Council or *Nagar Panchayat*.

3. Timely recovery of taxes is necessary for providing amenities such as water supply, sanitation, street lighting, roads, etc. To encourage the property owners to pay arrears of property taxes, the issue to exempt penalty was under consideration. However, at present, there is no provision to grant exemption of penalty on property taxes in the said Act. It is, therefore, considered necessary to amend section 150A of the said Act, to provide that the Council may, with the approval of the State Government, grant rebate in penalty to any person or class of persons primarily liable for payment of property taxes.

4. As both Houses of the State Legislature are not in session and the Governor of Maharashtra is satisfied that circumstances exist which render it necessary for him to take immediate action further to amend the Maharashtra Municipal Councils, *Nagar Panchayats* and Industrial Townships Act, 1965, for the purposes aforesaid, this Ordinance is promulgated.

Mumbai,
Dated the 30th April 2025.

C. P. RADHAKRISHNAN,
Governor of Maharashtra.

By order and in the name of the
Governor of Maharashtra,

DR. K. H. GOVINDA RAJ,

Principal Secretary to Government.

ON BEHALF OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, PRINTED AND PUBLISHED BY DIRECTOR, RUPENDRA DINESH MORE, PRINTED AT GOVERNMENT CENTRAL PRESS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004 AND PUBLISHED AT DIRECTORATE OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATIONS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004. EDITOR : DIRECTOR, RUPENDRA DINESH MORE.